रा.स.वि.नि. योजने अंतर्गत अर्थसहाय्य पुरविलेल्या यंत्रमाग सहकारी संस्थांच्या बांधकामाच्या प्रस्तावास मंजूरी देण्यासाठी राज्यस्तरीय समितीच्या नियुक्तीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः यंत्रमाग २०१७/प्र.क्र.१६/टेक्स-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०८ मार्च, २०१७.

वाचा :-

१) शासन निर्णय कृषि व सहकार विभाग क्र.एसपीएम-१०८८/प्र.क्र.१०८/८-सी, दि.२६/८/१९८८.
२) शासन निर्णय सववि/सूतगि-११८९/२४४२/१७/८-सी, दि.१६/३/१९८९.
३) शासन निर्णय क्र.सूतगि-१२९९/१०/प्र.क्र.५/टेक्स १, दि.२७/१/२०००
४) शासन निर्णय क्र.सूतगि-१२००/११७१३/प्र.क्र.४२६/टेक्स-१ (अ), दि.१६/११/२००२.
५) शासन निर्णय क्र.यंत्रमाग १०२०३/प्र.क्र.२/टेक्स-२, दि.८/४/२००३.

प्रस्तावना :-

रा.स.वि.नि. योजने अंतर्गत अर्थसहाय्य पुरविलेल्या यंत्रमाग सहकारी संस्थांच्या यंत्रसामुग्री खरेदीच्या प्रस्तावास मंजूरी देण्यासाठी राज्यस्तरीय समित्यांची नियुक्ती उपरोक्त वाचा क्र.५ अन्वये करण्यात आली आहे. मात्र रा.स.वि.नि. योजने अंतर्गत अर्थसहाय्य पुरविलेल्या यंत्रमाग सहकारी संस्थांच्या बांधकामाच्या प्रस्तावास मंजूरी देण्यासाठी कोणतीही समिती कार्यरत नव्हती. रा.स.वि.नि. योजने अंतर्गत अर्थसहाय्य पुरविलेल्या यंत्रमाग सहकारी संस्थांच्या बांधकामाच्या प्रस्तावास मंजूरी देण्यासाठी राज्यस्तरीय समित्यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात शासन आता खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

रा.स.वि.नि. योजने अंतर्गत अर्थसहाय्यीत यंत्रमाग सहकारी संस्थांच्या यंत्रमाग खरेदी / मागावर येण्या आधीची अथवा नंतरची प्रक्रीया / तयार कपडे / विणाई केंद्र यासाठी लागणाऱ्या बांधकामाबाबतचे प्रस्ताव यापुढे खालील प्रमाणे गठीत केलेल्या राज्यस्तरीय समितीपुढे मंजूरीसाठी सादर करावेत.

| १) | वित्तीय मर्यादा रुपये ५० लाखापर्यंत :- सदर प्रस्ताव मंजूरीसाठी प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली नियुक्त केलेल्या समिती समोर सादर करावेत. या समितीची रचना खालील प्रमाणे असेल. | |
|---|---|---|
| १) | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) | अध्यक्ष |
| २) | संचालक, हातमाग, यंत्रमाग व वस्त्रोद्योग, नागपूर | सदस्य सचिव |
| ३) | उप सचिव (वस्त्रोद्योग) | सदस्य |
| ४) | वस्त्रनिर्माण तज्ञ, हातमाग, यंत्रमाग व वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर | सदस्य |
| ५) | महाराष्ट्र राज्य सहकारी सूतगिरणी फेडरेशन मर्या. मुंबई चे व्यवस्थापकीय संचालक किंवा त्यांनी निर्देशित केलेले तांत्रिक अधिकारी | सदस्य |
| ६) | संबंधीत संस्थांचे अध्यक्ष / संबंधीत संस्थांचे अधिकृत प्रतिनिधी | निमंत्रित सदस्य |
| | | |

| | | |
|---|---|---|
| **२)** | वित्तीय मर्यादा रुपये ५० लाखाचे वर :- सदर प्रस्ताव मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे अध्यक्षतेखाली नियुक्त केलेल्या समिती समोर सादर करावेत. या समितीची रचना खालील प्रमाणे असेल. | |
| १) | मा. मंत्री (वस्त्रोद्योग) | अध्यक्ष |
| २) | मा. राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) | उपाध्यक्ष |
| ३) | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) | सदस्य |
| ४) | संचालक, हातमाग, यंत्रमाग व वस्त्रोद्योग, | सदस्य सचिव |
| ५) | उपसचिव (वस्त्रोद्योग) | सदस्य |
| ६) | व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य सूतगिरणी फेडरेशन किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ७) | संबंधीत संस्थांचे अध्यक्ष / संबंधीत संस्थांचे अधिकृत प्रतिनिधी | निमंत्रित सदस्य |

बांधकाम सनियंत्रण समितीच्या पूर्व परवानगी शिवाय कोणतेही बांधकाम करु नये.

संबंधीत सहकारी संस्थांना बांधकाम करण्यास अडचण उद्भवू नये याद्दष्टीने सनियंत्रण समितीची बैठक वेळोवेळी आयोजित करणेबाबत संचालक, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी लक्ष द्यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०८१४४९४९१००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pralhad Shankar Rode

Digitally signed by Pralhad Shankar Rode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=31ef26ac53da8a20dab1e924c7b422c7000cf345d3ffe590e023fa4caeb62a9d, serialNumber=4d2b089896597139348b165010a1a897e0fe12960037e28eb35541425e312388, cn=Pralhad Shankar Rode
Date: 2017.03.08 14:50:06 +05'30'

**( प्रल्हाद शं. रोडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
५. महालेखापाल, (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
६. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय,महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग, अमरावती / मुंबई / सोलापूर / नागपूर.
९. निवडनस्ती (टेक्स-२).